मराठी विश्वकोशाच्या अद्ययावतीकरणासाठी स्थापन करण्यात आलेल्या ज्ञानमंडळांना मुदतवाढ देणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः-विनिमं-२०२२/प्र.क्र.९०/भाषा-२,**
नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ जून, २०२३

**वाचा:-**

१. मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. विनिमं-२०१५/प्र.क्र.१७१/भाषा-२, दि.२३.०२.२०१६.
२. मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. विनिमं-२०१८/प्र.क्र.११०/भाषा-२, दि.२२.०२.२०१९.
३. मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. विनिमं-२०२०/प्र.क्र.११८/भाषा-२, दि.२८.०७.२०२१.
४. मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. विनिमं-२०२२/प्र.क्र.९०/भाषा-२, दि.३१.०१.२०२३.
५. महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे पत्र क्र.विनिमं-२०२३/ज्ञानमंडळ मुदतवाढ/१३०, दि.०३.०२.२०२३.

**प्रस्तावना :-**

मराठी विश्वकोशाच्या अद्ययावतीकरणासाठी संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये ज्ञानमंडळांची स्थापना ३ वर्षासाठी करण्यास मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये दि.२२.०२.२०२२ पर्यंत व संदर्भ क्र.०४ येथील शासन निर्णयान्वये दिनांक २२.०२.२०२३ पर्यंत ज्ञानमंडळांना मुदतवाढ देण्यात आली आहे. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ यांच्या मार्गदर्शनानुसार, मंडळाच्या प्रचलित कार्यपध्दतीमध्ये बदल प्रस्तावित आहेत. परंतु, त्यास काही कालावधी लागणार आहे. त्यामुळे विश्वकोशाच्या कामात खंड पडू नये आणि ज्ञानमंडळांनी अद्यापपावेतो केलेल्या कामांची देयके अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयाकडून पारीत करुन संबंधितांना अदा करण्यासाठी सध्या अस्तित्वात असलेल्या ज्ञानमंडळाच्या उपक्रमास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

मराठी विश्वकोशाच्या विषयनिहाय अद्ययावतीकरणासाठी तसेच विविध शाखांमधील नवीन संकल्पना, नवे विचार प्रवाह यांच्या नोंदी घेण्यासाठी विविध ज्ञानमंडळांची स्थापना करण्यात आली आहे. ज्ञानमंडळांकडून प्राप्त नोंदी तपासून महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाच्या कार्यालयाकडून मंडळाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द केल्या जातात. विश्वकोशाच्या खंडातील माहिती कालानुरुप अद्ययावत करणे गरजेचे असल्यामुळे दिनांक २३.०२.२०२३ पासून दिनांक २२.०२.२०२४ पर्यत ज्ञानमंडळांना मुदतवाढ देण्यात येत आहे. या मुदतवाढीच्या अनुषंगाने ज्ञानमंडळाच्या कामासाठी मंजूर करण्यात आलेली ४ सहायकाची पदे व १ संगणक अधिकारी पद अशी ५

कंत्राटी पदे मानधनावर बाह्यस्त्रोताव्दारे भरण्यात यावीत. मुदतवाढीनंतर ज्ञानमंडळाचे स्वरुप व रचना, कार्यपध्दती, मानधनाच्या अटी व शर्ती, सेवासुविधा आणि इतर खर्चाच्या बाबी दिनांक २३.०२.२०१६ च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार कायम राहतील.

याबाबत होणारा खर्च महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाच्या योजनांतर्गत योजनेच्या खर्चासाठी असलेल्या " मुख्य लेखाशीर्ष मागणी क्रमांक-झेडएफ-०२, २२०५-कला व संस्कृती (०२)(०३) मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे विकास कार्यक्रम- संगणक सांकेतांक क्रमांक-२२०५३२२३, ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (योजनांतर्गत योजना)" या लेखाशीर्षांतर्गत मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात येईल.

सदर खर्च करण्यास सहायक लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ हे नियंत्रण अधिकारी म्हणून काम पाहतील.

सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१९७/१४४३, दिनांक ०४.०५.२०२३ व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२९०/व्यय-४, दि.२९.०५.२०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६१४१७५६४७९१३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJASHRI UDAY BAPAT

Digitally signed by RAJASHRI UDAY BAPAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0abe21e41785319194707f89dc0e9ab5156282f4a89952d9774a26fade711538, pseudonym=1DEE74EBDCF0A24FC413634E0199E666505E847B, serialNumber=2976929866C57C5B5B45C06BBD6C5983FE47BAD04262C22CB9EC519621A4899F, cn=RAJASHRI UDAY BAPAT
Date: 2023.06.14 18:00:54 +05'30'

**( राजश्री बापट )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

३) सर्व मा.मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) मा.मुख्य सचिव/सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,

५) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई (पत्राने),

६) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने),

७) प्रबंधक, लोक आयुक्त आणि उप लोक आयुक्त कार्यालय, मुंबई,

८) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,

९) सर्व सदस्य, मराठी भाषा समिती, विधानमंडळ, मुंबई

१०) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),

११) सर्व विभागीय आयुक्त,

१२) सर्व जिल्हाधिकारी,

१३) कुलगुरू, सर्व विद्यापीठे

१४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,

१५) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई, नागपूर

१६) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),मुंबई, नागपूर,

१७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई

१९) भाषा संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

२०) सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई

२१) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,

२२) प्रशासकीय अधिकारी, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,

२३) सहायक भाषा संचालक, विभागीय कार्यालय, नवी मुंबई/ पुणे/नागपूर/औरंगाबाद

२४) अवर सचिव, (१४४३), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,

२५) अवर सचिव, (व्यय-४)/अर्थसंकल्प-१४, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

२६) सर्व मंत्रालयीन विभाग

२७) सर्व कार्यासने, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई

२८) संग्रहार्थ (भाषा - २).